अत्याचाराचे बळी ठरणा-या अनुसूचित जाती/अनुसूचित जमातींच्या व्यक्तींना नवीन अत्याचार प्रतिबंधक नियमान्वये देण्यात येणा-या नुकसान भरपाईबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्र.: युटीए २०१६/प्र.क्र. २९८/सामासु**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २३ डिसेंबर, २०१६

__वाचा__ :- १. शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र.: युटीए १६२१/३/टी रोएन पंचवीस दि. २९ नोव्हेंबर, १९८२.

२. अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती (अत्याचार प्रतिबंधक) अधिनियम, १९८९ चे सुधारित नियम, १९९५.

३. सहसचिव, कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांनी मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांना लिहिलेले अर्धशासकीय पत्र क्र.: ११०१२/३/८९/पीसीआर (डेस्क), दि. १७-०४-१९९५.

४. शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र.: युटीए१०९५/प्र.क्र.१६९/मावक-२ दिनांक २४ सप्टेंबर, १९९७

५. शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र.: युटीए२०१२/प्र.क्र.२५९/सामासू दिनांक २१ ऑगस्ट, २०१३

६. सहसचिव, सामाजिक न्याय आणि अधिकारीता मंत्रालय, नवी दिल्ली यांनी मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांना लिहिलेले अर्धशासकीय पत्र क्र.: ११०११/२४/२०१६पीसीआर (डेस्क), दि. १०.०५.२०१६ (दिनांक १४-०४-२०१६) अधिसूचनेसहीत.

**__प्रस्तावना :__**

नागरी हक्क संरक्षण अधिनियम, १९९५ अन्वये अस्पृश्यता पाळणे व ती पाळण्यास उत्तेजन देणे हा गुन्हा समजण्यात येत असून त्यासाठी सदर अधिनियमांत शिक्षेची तरतूद करण्यात आलेली असून अनुसूचित जाती/जमातींवर होणा-या अत्याचारांना पायबंध घालण्यासाठी अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती (अत्याचार प्रतिबंधक) अधिनियम, १९८९ लागू करण्यात आलेला आहे. त्या अधिनियमात १९९५ मध्ये केंद्र शासनाने सुधारणा महाराष्ट्र राज्यात लागू करण्यात आलेल्या आहेत.

केंद्र शासनाने सुधारित केलेल्या अनुसूचित जाती, जमाती (अत्याचार प्रतिबंधक) अधिनियम, १९८९ सुधारित नियम १९९५ च्या अधिन राहून दि.२१ ऑगस्ट,२०१३ च्या शासन निर्णयांसोबतच्या परिशिष्ट “अ” मध्ये नमूद केलेल्या अत्याचाराचे प्रकार किंवा गुन्ह्याचे प्रकार व त्यासाठी विहित केलेले सुधारित दर यानुसार नुकसान भरपाई देण्यात येते. केंद्र शासनाने सदर नियमात दुरुस्ती केली असून नुकसान भरपाईच्या रकमेत दिनांक १४/०४/२०१६ च्या अधिसूचनेनुसार वाढ केलेली आहे. त्याच

धर्तीवर केंद्र शासनाच्या सुधारणासहीत राज्यामध्ये नुकसान भरपाईच्या रकमेत वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

केंद्र शासनाने सुधारित केलेल्या अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती (अत्याचार प्रतिबंधक) अधिनियम, १९८९ सुधारित नियम २०१६ च्या अधिन राहून सोबतच्या परिशिष्ट “अ” मध्ये नमूद केलेल्या अत्याचाराचे प्रकार किंवा गुन्ह्याचे प्रकार किंवा त्यासाठी केंद्र शासनाने दिनांक १४/०४/२०१६ च्या अधिसूचनेनुसार विहित केलेल्या सुधारित दराप्रमाणे नुकसान भरपाई देण्याचा निर्णय राज्य शासनाने घेतला आहे.

२. ही सुधारित नुकसान भरपाई दि. १४.०४.२०१६ पासून अंमलात येईल.

३. यावर होणारा खर्च मागणी क्रमांक एन-३ २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१, अनुसूचित जातीचे कल्याण, ८००, इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०२) जिल्हा परिषदांना सहायक अनुदाने, (०२)(०३) अत्याचाराचे बळी ठरणा-या अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीच्या कुटुंबातील सदस्यांना आर्थिक सहाय्य देण्याची योजना (वि.घ.यो.) (राज्य हिस्सा) (२२२५ २४४२) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) व मागणी क्रमांक एन-३ व इतर मागासवर्ग यांचे कल्याण २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१, अनुसूचित जातीचे कल्याण, ८००, इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०२) जिल्हा परिषदांना सहायक अनुदाने, (०२)(०४) अत्याचाराचे बळी ठरणा-या अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीच्या कुटुंबातील सदस्यांना आर्थिक सहाय्य देण्याची योजना (के.पु.यो. ५० टक्के) (२२२५ २४५१ २४५१) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन त्याखाली वेळोवेळी केलेल्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

४. (१) जिल्हा दंडाधिकारी, पोलीस अधिक्षक व जिल्हा समाजकल्याण अधिकारी हे जेथे अत्याचार झाला असेल त्या जागेला किंवा त्या क्षेत्राला जिवितहानी आणि संपत्तीचे नुकसान यांचा अंदाज घेण्याकरीता भेट देतील आणि बळी पडलेल्या व्यक्ती व सहाय्य मिळण्यास पात्र असलेले त्यांच्या कुटुंबातील सदस्य आणि त्यांच्यावर अवलंबून असणा-या व्यक्तींची सूची तयार करील. (२) पहिल्या माहिती अहवालाची (F.I.R.ची) नोंद संबंधित पोलीस ठाण्याच्या वहीत नोंदणी केलेली आहे आणि आरोपीला ताब्यात घेण्याकरीता प्रभावी उपाय केलेले आहेत, याची पोलीस अधिक्षक खात्री करून घेईल. (३) पोलीस अधिक्षक घटना स्थळांच्या चौकशीनंतर ताबडतोब अन्वेषण अधिका-यांची नियुक्ती करील आणि या भागात पोलीस पथके पाठविल व त्याला योग्य आणि आवश्यक वाटत असतील, असे इतर प्रतिबंधनात्मक उपाय करील. (४) जिल्हा दंडाधिकारी अत्याचाराला बळी पडलेल्यांना, त्यांच्या कुटुंबियांना आणि त्यांच्यावर अवलंबून असणा-या व्यक्तींना, ताबडतोब या नियमांना जोडलेल्या प्रमाणकानुसार रोख रक्कम किंवा वस्तुच्या स्वरुपात किंवा दोन्ही पुरविण्याची तरतूद करील अशा त्वरीत मदतीत अन्न, पाणी, वस्त्र, निवारा, वैद्यकीय मदत, परिवहन सुविधा आणि

मानवी जीवनात आवश्यक असलेल्या इतर बाबी यांचा सुधा समावेश असेल. (५) पोटनियम ४ नुसार अत्याचारात बळी पडलेल्या व्यक्तीला किंवा त्यांच्यावर/तिच्यावर अवलंबून असणा-या व्यक्तींना मृत्यू किंवा दुखापत किंवा संपत्तीचे नुकसान या करीता देण्यात आलेले सहाय्य त्यावेळी अंमलात असलेल्या अन्य कोणत्याही कायद्यान्वये त्या बाबतीत नुकसानभरपाई मागण्याच्या अन्य कोणत्याही हक्क, मागणी व्यतिरिक्त असेल. (६) उपरोक्त पोटनियम ४ मध्ये नमूद केलेले सहाय्य आणि पुनर्वसन सुविधांची जिल्हा दंडाधिकारी यांच्याकडून या नियमांना जोडलेल्या अनुसूचितील दिलेल्या प्रमाणकानुसार तरतूद करण्यात येईल. (७) बळी पडलेल्या व्यक्तींना पुरविण्यात आलेले सहाय्य आणि पुनर्वसन सुविधांचा अहवाल जिल्हा दंडाधिकारी आणि पोलीस अधिक्षकांकडून विशेष न्यायालयाला सुध्दा पाठवण्यात येईल. विशेष न्यायालयाची जर अशी खात्री पटली असेल की, बळी पडलेल्या व्यक्तींना किंवा त्यांच्यावर अवलंबून असलेल्या व्यक्तींना वेळेवर सहाय्य दिले गेलेले नाही किंवा सहाय्याची रक्कम किंवा भरपाई पुरेशी नाही किंवा इतर अशा प्रकरणात सहाय्य किंवा इतर कोणत्याही प्रकारच्या मदतीने पूर्णत: देण्याचा ते आदेश देऊ शकतील.

**५.** **जातीयतेंच्या कारणावरुन** अनुसूचित जाती/अनुसूचित जमातीच्या कुटुबांवर /व्यक्तीवर अत्याचार घडल्यास सदर गुन्हयाची नोंद नागरी हक्क संरक्षण अधिनियम१९५५ व (अत्याचार प्रतिबंधक) अधिनियम १९८९ खाली झालेली असल्यास आवश्यक त्या गुन्हयात वैद्यकीय प्रमाणपत्र आवश्यक सर्व गुन्हयांमध्ये जातीचा दाखला आवश्यक आहे.तसेच संबधित अत्याचार पिडीताचे आधारकार्ड DBT ( थेट लाभ हस्तांतरण ) शी संलग्नीत असावे.

६ अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती (अत्याचार प्रतिबंधक) अधिनियम, १९८९ सुधारित नियम २०१५ च्या नियम १२ (४) अन्वये अत्याचारग्रस्त व्यक्ती किंवा कुटुंबांना जिल्हा दंडाधिकारी मदत मंजूर करतील व या मदतीचे वाटप जिल्हा समाजकल्याण अधिकारी करतील. जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांना सदर नुकसान भरपाई अदा करण्याच्या शक्ती प्रदान करण्यात येत आहेत. त्यांनाच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. संबंधित जिल्ह्यातील जिल्हा दक्षता व नियंत्रण समितीच्या मासिक बैठकीत या विषयाबाबत व त्या अन्वये देण्यात येणा-या नुकसानभरपाईचा आढावा घेऊन जिल्हा समाजकल्याण अधिकारी आपला अहवाल, आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे व आयुक्त एकत्रित अहवाल शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. : युटीए१०९५/१२४३२-डी-७, दि. २० डिसेंबर, १९७६ च्या प्रोफॉर्माप्रमाणे शासनास सादर करतील.

८. केंद्र शासन सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय,नवी दिल्ली यांच्या दि.१४ एप्रिल २०१६ च्या अधिसूचनेची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

९. या आदेशामधील वाक्रचनेमध्ये काही संदेह असल्यास सोबत जोडलेल्या केंद्र शासन सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय,नवी दिल्ली यांच्या दि.१४ एप्रिल २०१६ च्या अधिसूचनेच्या इंग्रजी प्रतीमधील वाक्यरचना विचारात घ्यावी.

१०. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३९६/२०१६/व्यय-१५, दि२५-०९-२०१६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२३१६३९५४९५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: CN = Dnyandev Laxman Sul, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice And Special Assistance
Date: 2016.12.26 11:46:13 +05'30'

**(ज्ञा.ल.सुळ)**

उप सचिव ,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्यमंत्र्याचे खाजगी सचिव
२) सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
३) सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
४) मुख्य सचिव यांचे उप सचिव
५) अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव मंत्रालयीन सर्व विभाग
६) सर्व विभागीय आयुक्त,
७) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) पोलीस महानिरीक्षक, मुंबई.
९) सर्व जिल्हाधिकारी
१०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
११) सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण
१२) संचालक राष्ट्रीय अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती आयोग, पुणे
१३) आयुक्त आदिवासी विभाग, नाशिक
१४) सर्व पोलीस आयुक्त
१५) सर्व पोलीस अधिक्षक
१६) पोलीस महानिरिक्षक (पीसीआर)
१७) विशेष न्यायालयाचे सर्व जिल्हे
१८) महालेखापाल (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र १-२, मुंबई/नागपूर
१९) सर्व जिल्हाकोषागार अधिकारी
२०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२१) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२२) सर्व जिल्हापरिषदांचे समाजकल्याण अधिकारी, वर्ग-२
२३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई
२४) सचिव, भारत सरकार, सामाजिक न्याय व अधिकारीता मंत्रालय, नवी दिल्ली
२५) संचालक, भारत सरकार, सामाजिक न्याय व अधिकारीता मंत्रालय, नवी दिल्ली
२६) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
२७) निवडनस्ती सामासु

शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व पर्यटन विभाग
क्रमांक : युटीए-१०७५/२२४३२-डी-७, दिनांक २० डिसेंबर, १९७६ चे सोबतचे सहपत्र

## PROFORMA

Report on the atrocities on members of Scheduled Castes and Scheduled Tribes and monetary relief sanctioned thereof in District.

| | | | |
|---|---|---|---|
| 1. | Date of Occurrence of the incident | : | |
| 2. | Village and Taluka | : | |
| 3. | Whether Victim belong to SCs/STs | : | |
| 4. | By which Community people, the atrocity is committed | : | |
| 5. | Brief facts of the incident | : | |
| 6. | Nature and extent of Loss<br><br>a) Number of earning members Involved in incident and out of whom<br><br>i) Number Died :<br>ii) Number permanently Incapacitated :<br>iii) Number temporarily incapacitated : | : | |
| | b) Number of non-earning members Involved in incident and out of whom<br><br>i) Number Died :<br>ii) Number permanently Incapacitated :<br>iii) Number temporarily incapacitated : | | |
| 7. | Number and Value of Property lost<br>a) I) Number of houses burnt :<br>ii) Value of houses burnt :<br>b) i) Number of families whose property was lost :<br>ii) Value of property was lost. | : | |
| 8. | Category-wise quantum of relief sanction due to<br>a) Death :<br>b) Permanent Incapacitation :<br>c) Temporary Incapacitation :<br>d) Burning of houses/s :<br>e) Loss of movable property : | : | |
| 9. | Total relief sanctioned | : | |

शासन निर्णय क्र. युटीए-२०१६/प्र.क्र.२९८/सामासु, दि. २३ डिसेंबर, २०१६ चे सहपत्र.

## परिशिष्ठ अ

## नियम १२ (४)

## सहाय्य म्हणून द्यावयाच्या रक्कमेची मानके

| अ.क्र. | अपराधाचे नाव | सहाय्याची किमान रक्कम |
|---|---|---|
| १. | कोणतेही खाण्यास किंवा पिण्यास योग्य नसलेले घाणरडे खाण्यास देणे व इतर उपद्रवी वस्तु घालणे अधिनियमांचे कलम ३(१) (a) | पीडित व्यक्तीला रु. १,००,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली (१) अ.क्र. (२) आणि (३) करीता प्रथम माहिती अहवाल ( FIR ) प्राप्त झाल्यानंतर १०% व अनु.क्र.(१), (४) व (५) करीता प्रथम माहिती अहवाल प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम (२) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम (३) आरोपीस अनु.क्र. २ व ३ च्या आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास ४०% व त्याचप्रमाणे अनु.क्र. १,४, व ५ च्या आरोपाखाली दोषसिध्द ठरविल्यास २५% रक्कम. |
| २. | मलमुत्र, विष्ठा, जनावराचे शव किंवा कोणतेही घाणेरडे पदार्थ एकत्रित ठेवणे किंवा जमा करणे अधिनियमाचे कलम ३(१) (b) | |
| ३. | अपमानित किंवा त्रास देण्याच्या हेतूने मलमुत्र, केरकचरा, जनावराचे शव एकत्रित ठेवणे किंवा जमा करणे अधिनियमांचे कलम ३(१)(c) | |
| ४. | चपल्लांचा हार घालणे किंवा नग्न किंवा अर्धनग्न मिरवणूक काढणे अधिनियमांचे (कलम ३(१)(d) | |
| ५. | बळजबरीने असे कृत्य करण्यास भाग पाडणे जसे कपडे काढणे, बळजबरीने डोक्यावरचे केस किंवा मिशा काढणे चेहरा वा शरीरावर रंग लावणे किंवा काळे फासणे अधिनिमांचे कलम ३(१) (e) ) | |
| ६. | जमिनीचा गैरप्रकारे भोगवटा करणे किंवा शेती करणे, इ. अधिनियमाचे कलम ३(१) ( f ) | पीडित व्यक्तीला रु. १,००,०००/- मदत. जिथे आवश्यक असेल तेथे संबंधीत राज्य सरकार किंवा संघराज्य प्रशासन द्वारे सरकारी खर्चाने जमीन /जागा/पाणी पुरवठा परत मिळवून देण्यात येईल. |
| ७. | जमीन किंवा जमिनीचा भाग बेकायदेशीरपणे बळकावणे किंवा | |

| | | |
|---|---|---|
| | कब्जा करणे किंवा त्या संबंधीच्या अधिकारामध्ये बाधा आणणे ज्यामध्ये वन अधिकाराचा समावेश आहे. अधिनियमांचे कलम ३(१)(g) | पिडीत व्यक्तीला मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली पुढीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम<br>(iii) आरोपीस कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्द/शिक्षा झाल्यास २५% रक्कम |
| ८. | भिक मागण्यास लावणे किंवा वेठबिगारी करावयास लावणे<br>अधिनियमांचे कलम ३(१)(h) | पीडीत व्यक्तीला रु. १,००,०००/- पर्यंत मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम.<br>(ii) आरोपीस कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास २५% रक्कम. |
| ९. | मनुष्याचे किंवा जनावराचे मृत शरीर घेऊन जाणे किंवा त्यांच्यासाठी कबर खोदणे/ खड्डा खोदण्यासाठी बळजबरी करणे अधिनियमांचे कलम ३(१)(i) | |
| १०. | अनुसूचित जातीच्या किंवा अनुसूचित जमातीच्या व्यक्तींना हाताने मैला साफ करण्यास भाग पाडणे किंवा त्यासाठी प्रयत्न करणे<br>अधिनियमांचे कलम ३(१) (j) | |
| ११. | अनुसूचित जातीच्या किंवा अनुसूचित जमाती या प्रवर्गातील स्त्रीला देवदासी बनण्यासाठी भाग पाडणे किंवा त्यासाठी प्रयत्न करणे किंवा त्याचे समर्थन करणे.<br>अधिनियमांचे कलम ३(१)(k) | |
| १२. | मतदान किंवा नामनिर्देशन दाखल करण्यापासून प्रतिबंध करणे अधिनियमांचे कलम ३(१)( L) | पीडीत व्यक्तीला रु. ८५ ,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे |

| | | |
|---|---|---|
| १३. | स्थानिक स्वराज्य संस्था/नगर पालिका मधील अधिकार पदावर असलेल्यांना पदाधिकारी /अधिकारी यांना कर्तव्य पार पाडण्यास अडसर करणे किंवा त्यांच्या कर्तव्यात अडथळे आणणे किंवा बळजबरी करणे<br>अधिनियमांचे कलम ३(१)(m) | (i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम.<br>(iii) आरोपीस कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास २५% रक्कम |
| १४. | निवडणूकीत हिंसाचारानंतर सामाजिक व आर्थिक बहिष्कार टाकणे अधिनियमांचे कलम ३(१)(n) | |
| १५. | एखाद्या विशिष्ट उमेदवारास मतदान करणे किंवा मतदान न करणे यासाठी सदर अधिनियमांतर्गत कोणताही गुन्हा करणे<br>अधिनियमांचे कलम ३(१)(o) | |
| १६. | खोटी, विद्वेषपूर्ण, तापदायक कायदेशीर कार्यवाही करणे<br>अधिनियमांचे कलम ३(१) (p) | पीडीत व्यक्तीला रु. ८५,०००/- इतकी मदत किंवा विधी विषयक केलेल्या वास्तविक खर्चाची प्रतिपूर्ती व नुकसान भरपाई यापैकी जी रक्कम कमी असेल ती मदत खालीलप्रमाणे देण्यात येईल.<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम<br>(iii) आरोपीस आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास २५% रक्कम. |
| १७. | कोणत्याही लोकसेवकास खोटी व थिल्लर माहिती देणे<br>अधिनियमांचे कलम ३(१)(q) | पीडीत व्यक्तीला रु. १,००,०००/- इतकी मदत किंवा विधी विषयक केलेल्या वास्तविक खर्चाची प्रतिपूर्ती व नुकसान |

| | | |
|---|---|---|
| | | भरपाई यापैकी जी रक्कम कमी असेल ती मदत खालीलप्रमाणे देण्यात येईल.<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम .<br>(ii) आरोपीस आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास २५% रक्कम |
| १८. | सार्वजनिक जागेत उद्देशपूर्वक अपमान किंवा अपमानाच्या हेतूने धाकदपटशा आणि मानहानी करणे<br>अधिनियम कलम ३(१)(r) | पीडीत व्यक्तीला रु. १,००,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम.<br>(iii) आरोपीस आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास २५% रक्कम. |
| १९. | सार्वजनिक ठिकाणी जातीयवाचक शिवीगाळ करणे किंवा जातीसंबंधी अपशब्द वापरणे<br>अधिनियम कलम ३(१)(s) | |
| २०. | धार्मिक मानल्या जाणाऱ्या अथवा श्रध्दास्थान असलेल्या स्थळांना हानी पोहचविणे, नष्ट करणे किंवा विटंबना करणे<br>अधिनियमाचे कलम ३(१)(t) | |
| २१. | शत्रुता, घृणा व वैमनस्यच्या भावनेला उत्तेजन देणे.<br>अधिनियमांचे कलम ३(१) ( u ) | |
| २२. | श्रध्दास्थान असलेल्या दिवंगत व्यक्तीविषयी अपशब्द वापरणे किंवा कोणत्याही वस्तू व साधनाद्वारे विटंबना करणे.<br>अधिनियमांचे कलम ३(१) (v ) | |

| | | |
|---|---|---|
| २३. | अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीच्या स्त्रियांना उद्देशपूर्वक लैंगिक हेतूसूचक लैंगिक भावना निर्माण करण्यासाठी अंगविक्षेप करणे व तिच्या संमतीशिवाय स्पर्श करणे अधिनियमांचे अंतर्गत गुन्हा करणे कलम ३(१)(w) | पीडीत व्यक्तीला रु. २,००,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम<br>(iii) आरोपीस आरोपीखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्द/शिक्षा झाल्यास २५% रक्कम. |
| २४. | भारतीय दंड प्रकिया संहितेचे कलम ३२६ व (१८६० चे ४५) जाणिवपुर्वक ॲसिड टाकणे किंवा ॲसिड टाकण्याचा प्रयत्न करणे {कलम ३(२) (va) अधिनियमांच्या अनुसूचीसह वाचावे} | क) पीडीत व्यक्तीचा चेहरा २ % किंवा त्यापेक्षा जास्त भाजला असेल तसेच डोळे,कान,नाक, तोंड आणि शरीर ३० % पेक्षा जास्त भाजले असेल अशा पीडीतास रुपये ८,२५,०००/- **(अक्षरी रुपये आठ लाख पंचवीस हजार फक्त)** मदत केली जाईल.<br>ख) ज्या पीडीत व्यक्तीचे शरीर १० % ते ३० % दरम्यान भाजले असेल अशा पीडीत व्यक्तीस **रुपये ४,१५,०००/- (अक्षरी रुपये चार लाख पंधरा हजार फक्त)** मदत केली जाईल.<br>ग) ज्या पीडीत व्यक्तीचे शरीर चेहऱ्या व्यतिरिक्त शरीर जर १० % पेक्षा कमी भाजले असेल अशा पीडीत व्यक्तीस रुपये **८५,०००/- (अक्षरी रुपये पंचाऐंशी हजार फक्त)** मदत केली जाईल.<br>या व्यतिरिक्त ॲसिड हल्ला झालेल्या पीडीत व्यक्तीचा संपूर्ण उपचार करण्याची जबाबदारी शासनाची राहिल .<br>उपरोक्त क ते ग मध्ये नमुद पिडीत व्यक्तीला मदत देण्याची कार्यप्रणाली खालील प्रमाणे - |

| | | |
|---|---|---|
| | | (i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर ५० % रक्कम<br>(ii) वैद्यकीय अहवाल प्राप्त झाल्यानंतर ५० % रक्कम. |
| २५. | भारतीय दंड प्रकिया संहिता कलम ३५४ (१८६० चे कलम ४५) अन्वये महिलांवर तिचा विनयभंग करण्याच्या हेतूने हल्ला करणे किंवा गुन्हेगारी बळ प्रयोग करणे.<br>{कलम ३(२) (va) अधिनियमांच्या अनुसूचीसह वाचावे} | पीडीत व्यक्तीला रु. २,००,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर ५० % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर २५ % रक्कम.<br>(iii) कनिष्ठ न्यायालयात सदर प्रकरणाची न्यायप्रक्रिया (Court Trial) समाप्तीनंतर २५% रक्कम. |
| २६. | भारतीय दंड प्रकिया संहिता कलम ३५४ अ (१८६० चे ४५) नुसार लैंगिक शोषण किंवा लैंगिक छळासाठी शिक्षा अधिनियमांचे {कलम ३(२) (va) अधिनियमांच्या अनुसूचिसह वाचावे} | पीडीत व्यक्तीला रु. २,००,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर ५० % रक्कम<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर २५ % रक्कम<br>(iii) कनिष्ठ न्यायालयात सदर प्रकरणाची न्यायप्रक्रिया (Court Trial) समाप्तीनंतर २५% रक्कम. |
| २७. | भारतीय दंड प्रकिया संहिता सहितेच्या कलम ३५४ ख (१८६० चे ४५) नुसार स्त्रीला निवस्त्र करण्याच्या उद्देशाने स्त्रीवर हल्ला करणे किंवा अपराधिक बलाचा वापर { कलम ३(२)(va) अधिनियमांच्या अनुसूचिसह वाचावे } | पीडीत व्यक्तीला रु. २,००,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर ५० % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर २५ % रक्कम.<br>(iii) कनिष्ठ न्यायालयात सदर प्रकरणाची न्यायप्रक्रिया (Court Trial) समाप्तीनंतर २५% रक्कम. |

| | | |
|---|---|---|
| २८. | भारतीय दंड प्रक्रिया सहिते अंतर्गत कलम ३५४सी (१८६० चे ४५) अन्वये इतरांचे वैषयिक सुख अनुभवत असताना ते पाहण्याची विकृती {कलम ३(२) (va) अधिनियमांच्या अनुसूचिसह वाचावे } | पीडीत व्यक्तीला रु. २,००,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे (i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर १० % रक्कम (ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम. (iii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास ४०% रक्कम. |
| २९. | भारतीय दंड प्रक्रिया सहितेच्या अंतर्गत कलम ३५४डी (१८६० चे ४५) अन्वये पाठलाग {कलम ३(२) (va) अधिनियमांच्या अनुसूचिसह वाचावे } | पीडीत व्यक्तीला रु. २,००,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे (i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर १० % रक्कम. (ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम. (iii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास ४०% रक्कम. |
| ३०. | भारतीय दंड प्रक्रिया सहितेच्या अंतर्गत कलम ३७६बी (१८६० चे ४५) अन्वये पती-पत्नी विभक्त असताना पतीने पत्नीबरोबर संभोग {कलम ३(२) (va) अधिनियमांच्या अनुसूचिसह वाचावे } | पीडीत व्यक्तीला रु. २,००,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे (i) वैद्यकीय तपासणी आणि वैद्यकीय अहवालाची पुष्टी अहवाल प्राप्त झाल्यानंतर ५०% रक्कम (ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर २५ % रक्कम (iii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास २५ % रक्कम. |
| ३१. | भारतीय दंड प्रक्रिया सहितेच्या अंतर्गत कलम ३७६सी (१८६० चे ४५) अन्वये प्राधिकारात असलेल्या एखाद्या व्यक्ती कडून संभोग | पीडीत व्यक्तीला रु. ४,००,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे |

| | | |
|---|---|---|
| | {कलम ३(२) (va))अधिनियमांच्या अनुसूचिसह वाचावे } | (i) वैद्यकीय तपासणी आणि वैद्यकीय अहवालाची पुष्टी अहवाल प्राप्त झाल्यानंतर ५०% रक्कम<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर २५ % रक्कम.<br>(iii) कनिष्ठ न्यायालयात सदर प्रकरणाची न्यायप्रक्रिया (Court Trial) समाप्तीनंतर २५% रक्कम. |
| ३२. | भारतीय दंड प्रक्रिया संहितेच्या अंतर्गत कलम ५०९ (१८६० चे ४५) अन्वये ज्याद्वारे स्त्रीला लज्जा उत्पन्न होईल त्या उद्देशाने शब्द प्रयोग वापरणे अथवा इशारा किंवा हातवारे करणे.<br>{कलम ३(२) (va) अधिनियमांच्या अनुसूचिसह वाचावे } | पीडीत व्यक्तीला रु. २,००,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम.<br>(iii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्द/शिक्षा झाल्यास २५ % रक्कम. |
| ३३. | पाणी दुषित किंवा खराब करणे {अधिनियमांचे कलम ३(१) (x) } | पाणी दूषित करण्यात आल्यानंतर ते स्वच्छ करुन पुर्ववत करण्यासाठीचा लागणारा संपुर्ण खर्च करण्याची जबाबदारी राज्य शासनाची असेल. या व्यतिरिक्त रुपये ८,२५,०००/-(अक्षरी आठ लाख पंचवीस हजार फक्त) इतकी रक्कम सामुहिक संपत्तीचे जतन करण्यासाठी जिल्हा प्रशासन स्थानिक संस्थेच्या सल्ल्यानुसार जिल्हा दंडाधिकारी यांच्याकडे जमा ठेव ठेवतील. |
| ३४. | सार्वजनिक प्रवेश करण्याचे / आश्रयाचे रुढीपात्र अधिकार नाकारणे किंवा पोचण्यासाठी अडथळे निर्माण करणे अधिनियमांचे कलम ३(१) (y) | पीडीत व्यक्तीला रुपये **४,२५,०००/- (अक्षरी चार लाख पंचवीस हजार फक्त)** तसेच रुढी परंपरेने प्राप्त प्रवेश मार्गाचा अधिकार पुर्ववत परत मिळणेसाठी लागणारा खर्च राज्य शासन करेल. |

| | | |
|---|---|---|
| | | त्यासाठी पीडीत व्यक्तीला मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम<br>(ii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्द/शिक्षा झाल्यास २५ % रक्कम |
| ३५. | बळजबरीने घर,गांव किंवा रहिवास सोडण्यास विवश करणे, जबरदस्ती करणे<br>अधिनियमाचे कलम ३(१) (Z) | अशा गुन्हयाच्या बळी ठरलेल्या प्रत्येक व्यक्तीला त्याचा घरात, गावात किंवा रहिवाशाच्या इतर जागेत राहण्याचा हक्क पुर्नस्थापित करण्याची कार्यवाही शासन करेल. जर त्याचे घर जमीनदोस्त झाले असल्यास सदरचे घर शासकीय खर्चाने बांधून देणे त्यासाठी रु. १,००,०००/- नुकसान भरपाई देण्यात येईल.<br>पिडीत व्यक्तीला मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम.<br>(iii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास २५ % रक्कम. |
| ३६ | अनुसूचित जातीच्या किंवा अनुसूचित जमातीच्या सभासदांनी खालील बाबतीत कोणत्याही प्रकारे अडथळा किंवा प्रतिबंधित करणे | अ) कोणत्याही बाबी संबंधी समाईक मिळकतीच्या साधनांचा वापर इतरांबरोबर कोणत्याही परिसरात किंवा दफन भूमीत किंवा स्मशान भूमीत किंवा कोणत्याही नदीचा वापर, ओढा, धबधबा, विहीर, हौद, पाण्याचे नळ, किंवा इतर |

| | | |
|---|---|---|
| | अ) समाईक मिळकतीच्या साधनांचा वापर इतरांबरोबर कोणत्याही परिसरात किंवा दफन भूमीत किंवा स्मशान भूमीत किंवा कोणत्याही नदीचा वापर, ओढा, धबधबा, विहीर, हौद, पाण्याचे नळ, किंवा इतर पाण्याची जागा किंवा स्नानाचे घाट किंवा सार्वजनिक वाहतुक किंवा रस्ते यांचा उपयोग किंवा वापर करणे<br>(अधिनियमाचे कलम ३(१) (za )/अ) | पाण्याची जागा किंवा स्नानाचे घाट किंवा सार्वजनिक वाहतुक किंवा रस्ते यांचा उपयोग किंवा वापर करण्याचा अधिकार पुर्नस्थापित करण्याबाबतची कार्यवाही व त्यासाठी लागणारा संपूर्ण खर्च शासन करेल. यासाठीपीडीत व्यक्तीला रुपये १,००,०००/-पिडीत व्यक्तीला मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम.<br>(ii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास २५ % रक्कम. |
| | ब) सार्वजनिक जागेत मोटार सायकल वर सवारी करणे किंवा चालविणे किंवा पादत्राणे घालणे किंवा नवीन कपडे परिधान करणे किंवा लग्नाची वरात काढणे किंवा लग्नाच्या वरातीदरम्यान घोडयावर आरुढ होणे किंवा इतर कोणत्याही वाहनांवर बसणे<br>(अधिनियमाचे कलम ३(१) (z a )/बी | ब) सार्वजनिक जागेत मोटार सायकल वर सवारी करणे किंवा चालविणे किंवा पादत्राणे घालणे किंवा नवीन कपडे परिधान करणे किंवा लग्नाची वरात काढणे किंवा लग्नाच्या वरातीदरम्यान घोडयावर आरुढ होणे किंवा इतर कोणत्याही वाहनांवर बसणे याबाबतचा अधिकार पुर्नस्थापन करण्याबाबतची कार्यवाही व त्यासाठी लागणारा संपूर्ण खर्च शासन करेल. यासाठी पीडीत व्यक्तीला रुपये १,००,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम. |

| | | |
|---|---|---|
| | | (iii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास २५ % रक्कम. |
| | क) कोणत्याही सार्वजनिक प्रार्थनास्थळी प्रवेश करणे जे सार्वजनिक किंवा कोणत्याही व्यक्तीसाठी खुले आहेत जे त्याच धर्माचे भाग आहेत किंवा कोणत्याही धर्माचे उत्सव किंवा सामाजिक किंवा सांस्कृतिक उत्सव ज्यामध्ये यात्रा, जत्रा आहेत त्या काढणे किंवा त्यामध्ये भाग घेणे. {अधिनियमांचे कलम ३ (१) (/सी} | क) कोणत्याही सार्वजनिक प्रार्थनास्थळी प्रवेश करणे जे सार्वजनिक किंवा कोणत्याही व्यक्तींसाठी खुले आहेत, जे त्याच धर्माचे भाग आहेत किंवा कोणत्याही धर्माचे उत्सव किंवा सामाजिक किंवा सांस्कृतिक उत्सव ज्यामध्ये यात्रा,जत्रा आहेत त्यामध्ये भाग घेणे किंवा त्या काढणेबाबतचा अधिकार अधिकाराचे पुर्नस्थापन करण्याबाबतची कार्यवाही व त्यासाठी लागणारा संपूर्ण खर्च शासन करेल. यासाठी पीडीत व्यक्तीला रुपये १,००,०००/- **मदत** देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम.<br>(iii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास २५ % रक्कम. |
| | ड) कोणतेही सार्वजनिक शैक्षणिक संस्था, रुग्णालय, औषधालय, प्राथमिक आरोग्य केंद्र, दुकान किंवा सार्वजनिक करमणुकीच्या ठिकाणी किंवा इतर कोणत्याही किंवा सार्वजनिक वापरासाठी प्रवेश असलेल्या ठिकाणी सार्वजनिक उपयोगासाठी वापरता येत | ड) कोणतेही सार्वजनिक शैक्षणिक संस्था, रुग्णालय, औषधालय, प्राथमिक आरोग्य केंद्र, दुकान किंवा सार्वजनिक करमणुकीच्या ठिकाणी किंवा इतर कोणत्याही किंवा सार्वजनिक वापरासाठी प्रवेश असलेल्या ठिकाणी सार्वजनिक उपयोगासाठी वापरता येत असलेल्या कोणत्याही वस्तु किंवा भांडे यांचा उपयोग |

| | | |
|---|---|---|
| | असलेल्या कोणत्याही वस्तु किंवा भांडे यांचा उपयोग करणे. {अधिनियमांचे कलम ३ (१) (झेड)/डी } | करण्याचा अधिकार पुर्नस्थापित करण्याबाबतची कार्यवाही व त्यासाठी लागणारा संपूर्ण खर्च शासन करेल.यासाठीपीडीत व्यक्तीला रुपये १,००,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम.<br>(iii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास २५ % रक्कम. |
| | इ) कोणताही व्यवसाय करणे किंवा कोणताही व्यापार करणे किंवा व्यवसाय किंवा इतर कोणत्याही क्षेत्रात नोकरी किंवा काम करणे ते किंवा ज्यामध्ये इतर समाजाच्या सभासदांना त्यामध्ये पोहोचण्याचा किंवा शिरकाव करण्याचा हक्क आहे.<br>{अधिनियमांचे कलम ३ (१) (झेड ए)/इ } | इ) कोणताही व्यवसाय करणे किंवा कोणताही व्यापार करणे किंवा व्यवसाय किंवा इतर कोणत्याही क्षेत्रात नोकरी किंवा काम करणे ते किंवा ज्यामध्ये इतर समाजाच्या सभासदांना त्यामध्ये पोहोचण्याचा किंवा शिरकाव करण्याचा हक्क आहे त्याबाबतचा अधिकार पुर्नस्थापित करण्याबाबतची कार्यवाही व त्यासाठी लागणारा संपूर्ण खर्च शासन करेल. यासाठी पीडीत व्यक्तीला रुपये १,००,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम.<br>(iii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्द/शिक्षा झाल्यास २५ % रक्कम. |

| | | |
|---|---|---|
| ३७. | चेटकीन किंवा जादुटोणा करणारी स्त्री असा आरोप असलेल्या स्त्रीस शारीरिक अथवा मानसिक हानी पोहचविणे {अधिनियमांचे कलम ३(१) (झेडबी)} | पीडीत व्यक्तीचा झालेला अपमान, अनादर, अप्रतिष्ठा, क्षती , बदनामी याला अनुसरुन देय नुकसानभरपाई म्हणून पीडीत व्यक्तीला रु. १,००,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम.<br>(iii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास २५ % रक्कम. |
| ३८. | सामाजिक व आर्थिक बहिष्कार टाकणे किंवा तशी धमकी देणे {अधिनियमांचे कलम ३(१) (झेडसी)} | अन्य व्यक्तीबरोबर असणारी सामाजिक व आर्थिक समानता पुर्नस्थापित करण्याबाबतची कार्यवाही व त्यासाठी लागणारा संपूर्ण खर्च शासन करेल. पीडीत व्यक्तीस **रुपये १,००,०००/- (अक्षरी एक लाख रुपये फक्त)** मदत म्हणून दिली जाईल. मदत म्हणून देण्यात येणारी संपूर्ण रक्कम कनिष्ठ न्यायालयात आरोपपत्र दाखल होताच देण्यात यावी. |
| ३९. | खोटा पुरावा देणे किंवा खोटा पुरावा तयार करणे<br>{अधिनियमांचे कलम ३(२) (i) आणि (ii)} | पीडीत व्यक्तीस **रुपये ४,५०,०००/- (अक्षरी चार लाख पन्नास हजार रुपये फक्त)** मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम.<br>(iii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास २५ % रक्कम. |

| | | |
|---|---|---|
| ४०. | भारतीय दंड प्रक्रिया संहितेच्या अंतर्गत १८६० च्या ४५ नुसार ज्यासाठी १० वर्ष किंवा त्याहून अधिक शिक्षा होऊ शकतो असे भारतीय दंड संहितेखालील गुन्हे करणे<br>अधिनियमांचे कलम ३(२) } | पीडीत व्यक्ती किंवा त्यांच्यावर अवलंबून असणा-या व्यक्तींना रक्कम रुपये ४,००,०००/- **(अक्षरी रुपये चार लाख फक्त)** मदत. या अनुसूचिमध्ये विशेष असे इतर काही नमुद असल्यास सदरच्या रक्कमेमध्ये बदल होवू शकतो.<br>पिडीत व्यक्तीला मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम.<br>(iii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्द/शिक्षा झाल्यास २५ % रक्कम. |
| ४१. | भारतीय दंडप्रक्रिया संहितेच्या अंतर्गत (१८६० च्या ४५) नुसार ज्या कलमाची तरतुद या अधिनियमात अधिसूचित केली आहे व जे दंडनिय आहेत असे गुन्हे करणे.<br>अधिनियमांचे कलम ३(२) (व्हीए) अनुसूचीसह वाचावे } | पीडीत व्यक्ती किंवा त्यांच्यावर अवलंबून असणा-या व्यक्तींना रुपये **२,००,०००/- (अक्षरी रुपये दोन लाख फक्त)** ) मदत या अनुसुचिमध्ये विशेष असे इतर काही नमुद असल्यास सदरच्या रक्कमेमध्ये बदल होवू शकतो.<br>पिडीत व्यक्तीला मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम.<br>(iii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास २५ % रक्कम. |
| ४२. | सरकारी अधिकारी किंवा कर्मचारी यांच्या माध्यमातून त्रास देणे किंवा | पीडीत व्यक्तीस रुपये **२,००,०००/- (अक्षरी रुपये दोन लाख फक्त)** ) मदत |

| | | |
|---|---|---|
| | सरकारी नोकऱ्या कार्यवाहीचा बळी ठरणे<br>{अधिनियमांचे कलम ३(२)(vii)} | देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) प्रथम माहिती अहवाल (FIR) प्राप्त झाल्यावर २५ % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम.<br>(ii) आरोपीस सदर आरोपाखाली कनिष्ठ न्यायालयाने दोषसिध्दी/शिक्षा झाल्यास २५ % रक्कम. |
| ४३. | विकलांगता अनेक विकलांगताबाबत मुल्यांकन करण्यासाठी मार्गदर्शन पध्दत सामाजिक न्याय व सशक्तीकरण मंत्रालयाच्या अधिसुचना क्र. १६-१८/९७ एन दिनांक ०१/०६/२००१ च्या अधिसूचने अन्वये ठरविण्यात आलेली मार्गदर्शक तत्वे. परिशिष्ट-II जोडले आहे.<br>अ) १०० टक्के विकलांगता | पीडीत व्यक्तीला **रुपये ८,२५,०००/- (अक्षरी आठ लाख पंचवीस हजार रुपये फक्त)** मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>१) वैद्यकीय तपासणी आणि वैद्यकीय अहवालाची पुष्टी अहवाल प्राप्त झाल्यानंतर ५०% रक्कम<br>२) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम |
| | ब) जिथे विकलांगता १०० टक्के पेक्षा कमी असेल परंतु ५० टक्के पेक्षा जास्त | पीडीत व्यक्तीस **रुपये ४,५०,०००/- (अक्षरी रु. चार लाख पन्नास हजार फक्त)** मदत<br>देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>१) वैद्यकीय तपासणी आणि वैद्यकीय अहवालाची पुष्टी अहवाल प्राप्त झाल्यानंतर ५०% रक्कम<br>२) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम. |
| | क) जिथे विकलांगत ५० टक्के पेक्षा कमी | पीडीत व्यक्तीस **रुपये २,५०,०००/- (अक्षरी रु. दोन लाख पन्नास हजार फक्त)** मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे |

| | | |
|---|---|---|
| | | १) वैद्यकीय तपासणी आणि वैद्यकीय अहवालाची पुष्टी अहवाल प्राप्त झाल्यानंतर ५०% रक्कम<br>२) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम. |
| ४४ | बलात्कार किंवा सामुहिक बलात्कार<br>(i) भारतीय दंड प्रक्रिया संहितेच्या अंतर्गत कलम ३७५ (१८६० चे ४५) अन्वये | पीडीत व्यक्तीस **रुपये ५,००,०००/- (अक्षरी रु. पाच लाख फक्त) मदत** देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) वैद्यकीय तपासणी आणि वैद्यकीय अहवालाची पुष्टी अहवाल प्राप्त झाल्यानंतर ५०% रक्कम<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर २५ % रक्कम<br>(iii) कनिष्ठ न्यायालयात सदर प्रकरणाची न्यायप्रक्रिया (Court Trial) समाप्तीनंतर २५% रक्कम. |
| | (ii)सामुहिक बलात्कार<br>भारतीय दंड प्रक्रिया संहितेच्या अंतर्गत कलम ३७६डी (१८६० चे ४५) अन्वये | पीडीत व्यक्तीस रुपये ८,२५,०००/- मदत देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे<br>(i) वैद्यकीय तपासणी आणि वैद्यकीय अहवालाची पुष्टी अहवाल प्राप्त झाल्यानंतर ५०% रक्कम<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर २५%रक्कम<br>(iii) कनिष्ठ न्यायालयात सदर प्रकरणाची न्यायप्रक्रिया ( Court Trial) समाप्तीनंतर २५% रक्कम |
| ४५ | हत्या किंवा मृत्यु | पीडीत व्यक्तीस **रुपये ८,२५,०००/- (अक्षरी रु. आठ लाख पंचवीस हजार फक्त) मदत** देण्याबाबतची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे |

| | | |
|---|---|---|
| | | (i) शवविच्छेदन अहवाल प्राप्त झाल्यानंतर ५० % रक्कम.<br>(ii) न्यायालयात आरोपपत्र दाखल होईल त्या नंतर ५० % रक्कम. |
| ४६ | खून, मृत्यु, हत्याकांड, बलात्कार, सामुहिक बलात्कार, कायमची असमर्थता आणि दरोडा यामधील पिडीतास अतिरिक्त सहाय्य | वरीलप्रमाणे अदा करण्यात आलेल्या अर्थसहाय्याच्या बाबींच्या रक्कमाशिवाय अतिरिक्त अर्थसहाय्याच्या रक्कमांची मदत अत्याचाराच्या दिनांकापासून ३ महिन्याच्या आत करण्यात यावी.<br>(i) अनुसूचित जातीच्या व अनुसूचित जमातीच्या मृत व्यक्तींच्या अवलंबिताना रुपये ५,०००/- प्रति महिना मुळ निवृत्ती वेतन जसे शासनाच्या शासकीय कर्मचा-यांना अनुज्ञेय आहे, महागाई भत्यासह व मृत व्यक्तीच्या कुटुंबाच्या एका व्यक्तीस नोकरी आणि आवश्यक असल्यास शेतजमीन, घर मालकी हक्काच्या खरेदीने घेण्यासाठी तरतूद करण्यात येईल.<br>(ii) पीडित व्यक्तीच्या मुलांचे शिक्षण व मुलांचे निर्वाह / आश्रयांचे भार ज्या शाळेस संपूर्ण निधी शासनाकडून प्राप्त होते अशा शाळेत होईल.<br>(iii) तीन महिन्यांच्या कालावधीसाठी भांडी, तांदूळ, गहू , डाळी, कडधान्य इत्यादींची तरतूद करणे. |
| ४७ | संपूर्णपणे जमीनदोस्त झालेले/ जळून खाक झालेली घरे | ज्या ठिकाणी घर जळून गेले आहे किंवा जमीनदोस्त झाले आहे अशा ठिकाणी ते सरकारी खर्चाने दगड विटांचे बांधकाम करुन बांधून देणे. |

**MINISTRY OF SOCIAL JUSTICE AND EMPOWERMENT**

**(Department of Social Justice and Empowerment)**

**NOTIFICATION**

New Delhi, the 14th April, 2016

**G.S.R. 424 (E).**—In exercise of the powers conferred by sub-section (1) of section 23 of the Scheduled Castes and the Scheduled Tribes (Prevention of Atrocities) Act, 1989 (33 of 1989), the Central Government hereby makes the following rules further to amend the Scheduled Castes and the Scheduled Tribes (Prevention of Atrocities) Rules, 1995, namely:-

1. *(1)* These rules may be called the Scheduled Castes and the Scheduled Tribes (Prevention of Atrocities) Amendment Rules, 2016.

*(2)* They shall come into force on the date of their publication in the Official Gazette.

2. In the Scheduled Castes and the Scheduled Tribes (Prevention of Atrocities) Rules, 1995 (hereinafter referred to as the said rules), in rule 2, for clause (b), the following clause shall be substituted, namely:-

'(b) " dependent" means the spouse, children, parents, brother and sister of the victim, who are dependent wholly or mainly on such victim for support and maintenance; '.

3. In the said rules, in rule 4, —

(a) for sub-rule (1) , the following shall be substituted, namely:-

" (1) The State Government, on the recommendation of the District Magistrate , shall prepare for each District a panel of such number of eminent senior advocates who have been in practice for not less than seven years, as it may deem necessary for conducting cases in the Special Courts and Exclusive Special Courts.

(1A) The State Government in consultation with the Director Prosecution or in charge of the prosecution, shall also specify a panel of such number of Public Prosecutors and Exclusive Special Pubic Prosecutors, as it may deem necessary for conducting cases in the Special Courts and Exclusive Special Courts, as the case may be.

(1B) Both the panels referred to in sub-rule (1) and sub-rule (1A) shall be notified in the Official Gazette of the State and shall remain in force for a period of three years. " ;

(b) in sub-rule (2) , for the words " Special Public Prosecutors", the words "Special Public Prosecutors and Exclusive Special Public Prosecutors" shall be substituted;

(c) in sub-rule (3) , for the words " a Special Public Prosecutor", the words " a Special Public Prosecutor or an Exclusive Special Public Prosecutor" shall be substituted;

(d) for sub-rule (4) of rule 4, the following sub-rule shall be substituted, namely:-

" (4) The District Magistrate and the officer-in-charge of the prosecution at the District level, shall review,—

(a) the position of cases registered under the Act ;

